**सांगली जिल्ह्यातील तासगांव तालुक्यातील इजिमा क्र.९९ ते मणेराजूरी जमदाडेवस्ती खैराटवस्ती रस्त्याची लांबी ग्रामीण मार्ग क्र.६९ मध्ये समाविष्ट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.४६/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १७ मार्च, २०२०.

<u>पहावे</u> :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/५९/३७५१/२०१८, दि.२१.०५.२०१८,
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/५९/६२१/२०२०, दि.१३.०२.२०२०.

**<u>प्रस्तावना</u> :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सांगली जिल्ह्यातील तासगांव तालुक्यातील इजिमा क्र.९९ ते मणेराजूरी जमदाडेवस्ती खैराटवस्ती रस्त्याची २.७५० कि.मी. लांबी ग्रामीण मार्ग क्र.६९ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सांगली यांनी सदर रस्त्याची लांबी समाविष्ट करणेबाबत विनंती केलेली आहे.

सदर रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, सांगली यांची विनंती विचारात घेता सदर रस्ता ग्रामीण मार्ग क्र.६९ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय</u>** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सांगली यांची विनंती विचारात घेऊन सांगली जिल्ह्यातील इजिमा क्र.९९ ते मणेराजूरी जमदाडेवस्ती खैराटवस्ती रस्त्याची २.७५० कि.मी. लांबी, साखळी क्र. ००/०० ते २/७५० रस्तग्रामीण मार्ग क्र.६९ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहे.

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील सांगली जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **२.७५० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (५९२२.८१०+२.७५०) म्हणजेच **५९२५.५६ कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००३१७१२२५१८६०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.03.17 12:28:12 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
२) विभागीय आयुक्त, पुणे.
३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
४) जिल्हाधिकारी, सांगली.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सांगली.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगली.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.